केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान योजनेकरिता अनुसूचित जाती प्रवर्गाचा सन २०१९-२० या आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी सन २०२०-२१ च्या अर्थसंकल्पीय निधीतून वितरीत करणेबाबत.
केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २२१०जी६१८)
राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २२१०जी६२७)

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२०/प्र.क्र.१४ /अर्थसंकल्प (विघयो)**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- २३ नोव्हेंबर, २०२०

**वाचा :-** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६.०४.२०२०

२) सार्वजनिक आरोग्य विभागाची नस्ती क्र.एनयुएचएम-०९१९/प्र.क्र.४७९/आरोग्य-७

३) शासन निर्णय समक्रमांक दि.१३.१०.२०२०

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान योजनेसाठी अनुसुचित जाती प्रवर्गासाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २२१०-सार्वजनिक आरोग्य, ७८९-अनुसूचित जाती उपयोजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०७) राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २२१०जी६१८, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) खाली रु.१९१५.३९ लाख तर (०१) (०८) राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २२१०जी६२७, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) खाली रु.११४७.१९ लाख इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. या योजनेसाठी लेखाशिर्ष २२१०जी६१८ (केंद्र हिस्सा) मध्ये रु.३८३.०७८ लाख तर लेखाशिर्ष २२१०जी६२७ (राज्य हिस्सा) मध्ये रु.२२९.४३८ लाख असा एकूण रु.६१२.५१६ लाख इतका निधी दि.१३.१०.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक १६ एप्रिल, २०२० रोजीच्या परिपत्रकान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या पहिल्या ३ महिन्याकरिता अनिवार्य व कार्यक्रम खर्चाच्या एकूण वार्षिक अर्थसंकल्पित तरतूदींच्या १५ ते २५ टक्क्याच्या मर्यादेत ठराविक उद्दीष्टांसाठी निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. तसेच केंद्र पुरस्कृत योजनांच्या मागील वर्षामधील निधी वितरणाकरिता वित्त विभागाची सहमती घेणे अनिवार्य केले आहे. या अनुषंगाने सार्वजनिक आरोग्य विभागाच्या संदर्भाधीन नस्तीवर वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन व सार्वजनिक आरोग्य विभागाच्या संदर्भाधीन क्र.२ येथील प्रस्तावास अनुसरुन या योजनेतील सन २०१९-२० या वर्षातील अखर्चित निधी करीता उपरोक्त सन २०२०-२१ करीता अर्थसंकल्पीत तरतूदीतून, (०१) (०७) राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २२१०जी६१८, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षामधून रु.१५३२.३१२ लाख तर (०१) (०८) राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २२१०जी६२७, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षामधून रु.९१७.७५२ लाख असा एकूण रु.२४५०.०६४ लाख इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. लॉक डॉऊनमुळे पुढील ३ ते ४ महिने राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरुपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, सामाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व सार्वजनिक आरोग्य विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.३९६/२०२०/व्यय-१३, दि.४.११.२०२० अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०११२४१५०६१५८९२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Prashant Pundlik Wagh

Digitally signed by Prashant Pundlik Wagh
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, serialNumber=5599270e38b296e5e5d814ff5976561a3ec66d875aeb425d735e1d7c12140929, cn=Prashant Pundlik Wagh
Date: 2020.11.24 15:10:52 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) सर्व जिल्हाधिकारी
४) महासंचालक, आरोग्य सेवा, मुंबई
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) सर्व विभागीय आयुक्त,
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१०) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११) सार्वजनिक आरोग्य विभाग (आरोग्य-७), मंत्रालय, मुंबई
१२) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग